# आकाशगंगेच्या प्रभामंडळात फिकट दीर्घिकेचा शोध

०१. आकाशगंगेच्या प्रभामंडळात असलेली बटू उपदीर्घिका सापडली असून ती सर्वात फिकट आहे. त्यातून दीर्घिकांची निर्मिती व कृष्णद्रव्याचे अवकाशातील विखुरणे याबाबत नवीन माहिती मिळणार आहे.

०२. या बटू उपदीर्घिकेचे नाव व्हिरगो १ असून ती कन्या तारकासमूहात आहे. जपानच्या टोहोकू विद्यापीठाच्या संशोधकांनी ही दीर्घिका शोधली असून आकाशगंगेच्या प्रभामंडळात अशा अनेक फिकट उपदीर्घिका असू शकतात असे त्यांचे मत आहे.

०३. सध्या अशा ५० उपदीर्घिका शोधण्यात आलेल्या असून त्यातील ४० फिकट व ड्वार्फ स्फेरॉइडल गॅलेक्सिज प्रकारातील आहेत. त्यातील अनेक दीर्घिका अलीकडे शोधल्या असून त्यांची प्रकाशमानता उणे ८ आहे.

०४. यापूर्वी २.५ ते ४ मीटर व्यासाच्या दुर्बिणीतून दीर्घिका शोधण्यात आल्या आहेत, त्यामुळे जास्त प्रकाशमान दीर्घिका शोधल्या गेल्या आहेत. दूरच्या व कमी प्रकाशमान दीर्घिका यात शोधण्यात आल्या नव्हत्या.

०५. आता ८.२ मीटर सुबारू दुर्बीण व हायपर सुप्राइम कॅम उपकरणाने शोध घेतला असता फिकट व बटू दीर्घिका सापडत आहेत. या दोन्ही उपकरणांची माहिती तपासून पाहिली असता कन्या तारकासमूहात जास्त घनतेचे तारे दिसले होते, ते प्राचीन तारका प्रणालीचे निदर्शक आहेत, असे टोहोकू विद्यापीठाचे डायसुक होमा यांनी सांगितले.

०६. आता शोधण्यात आलेली दीर्घिका ही फिकट असून तिची प्रकाशमानता उणे ०.८ आहे. होमा यांना व्हिर्गो १ दीर्घिका मसाशी छिबा यांच्या मार्गदर्शनाखाली निरीक्षण करताना सापडली आहे. तिची त्रिज्या १२४ प्रकाशवर्षे आहे.

०७. यापूर्वी सेग्यू १ ही फिकट म्हणजे कमी प्रकाशमान दीर्घिका स्लोन डिजिटल स्काय सर्व्हेत, तर सेटस २ दीर्घिका डार्क एनर्जी सर्व्हेत सापडली होती. सेटस २ या दीर्घिकेच्या शोधावर अजून शिक्कामोर्तब होणे बाकी आहे.

०८. व्हिर्गो १ ही आतापर्यंत शोधलेली सर्वात फिकट दीर्घिका असून ती सूर्यापासून २ लाख ८० हजार प्रकाशवर्षे दूर आहे. आकाशगंगेच्या प्रभामंडळात अनेक फिकट दीर्घिका असू शकतात, असे छिबा यांनी म्हटले आहे.

## भारतीय पत्रकारासह चार पत्रकारांना वृत्तपत्र स्वातंत्र्य पुरस्कार

०१. भारतीय पत्रकार मालिनी सुब्रह्मण्यम यांना नक्षलग्रस्त बस्तर भागातून केलेल्या वार्ताकनासाठी आंतरराष्ट्रीय वृत्तपत्र स्वातंत्र्य पुरस्कार प्रदान करण्यात आला.

०२. एकूण चार पत्रकारांना दरवर्षी या पुरस्काराने सन्मानित करण्यात येते. मालिनी सुब्रह्मण्यम यांना एल साल्वादेरचे ऑस्कर मार्टिनेझ व तुर्कस्थानचे कान डुंदर यांच्यासमवेत पुरस्कार देण्यात आला.

०३. इजिप्तचे सध्या तुरुंगात असलेले छायाचित्रकारअबाऊ झैद ऊर्फ शौकन यांना अनुपस्थितीत पुरस्कार प्रदान करण्यात आला.

०४. सुब्रह्मण्यम या स्क्रॉल या संकेतस्थळासाठी काम करीत असून, त्यांनी नक्षलग्रस्त भागात महिलांविरोधात होणारा लैंगिक हिंसाचार, पोलीस व सुरक्षा दले यांच्याकडून होणारा अत्याचार याविरोधात बातम्या दिल्या होत्या.

०५. छत्तीसगडमधील बस्तर जिल्हय़ात नक्षलग्रस्त भागात लहान मुलांना होणारा कारावास, बंद पडलेल्या शाळा, न्यायबाहय़ मृत्यू, पत्रकारांना धमक्या असे विषय त्यांनी बातम्यांतून हाताळले.

०६. सुब्रह्मण्यम यांनी सांगितले, की माझे जाबजबाब घेण्यात आले, पोलीस व पोलिसांच्या खबऱ्यांनी छळ केला, माझ्यावर पाळतही ठेवण्यात आली. या परिस्थितीतही मानवी हक्कांच्या उल्लंघनाबाबत व तेथील राजकारणाबाबत बातम्या दिल्या. पोलिसांनी मला माओवाद्यांची हस्तक ठरवण्याचाही प्रयत्न केला.

०७. मार्टिनेझ यांना एल साल्वादोर येथून तीन आठवडे बाहेर जावे लागले, कारण त्यांना पोलिसांनी ठार केलेल्या आठ संशयितांच्या प्रकरणातील चौकशीबाबत धमक्या येत होत्या.

०८. दुंदर यांना २६ नोव्हेंबर २०१५ रोजी अटक करण्यात आली होती, कारण सरकारी गुप्तचरांनी सीरियन बंडखोर गटांना शस्त्रे पाठवण्याचा प्रयत्न केल्याबाबत लेख त्यांनी लिहिला होता. सरकारी गुपिते फोडल्याचा आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला होता.

०९. झैद यांना १४ ऑगस्ट २०१३ रोजी अटक करण्यात आली असून, त्यांच्यावर हत्यारे बाळगणे, बेकायदेशीर जमाव जमवणे, खून व खुनाचा प्रयत्न असे आरोप ठेवण्यात आले आहेत.

१०. या चार पत्रकारांनी जीव धोक्यात घालून वृत्तपत्र स्वातंत्र्य जिवंत ठेवले आहे व समाजाला महत्त्वाच्या घटनांबाबत खरी माहिती दिली आहे, असे कमिटी टू प्रोटेक्ट जर्नालिस्ट या संस्थेने पुरस्कारार्थींचा सन्मान करताना म्हटले आहे.

## अमेरिका प्रशासनात भारतीय वंशाच्या व्यक्तीला कॅबिनेट दर्जा

०१. अमेरिकेचे नवनिर्वाचित अध्यक्ष डोनाल्ड ट्रम्प यांच्या प्रशासनातील पहिली महिला होण्याचा मान भारतीय वंशाच्या निक्की हॅले यांना मिळाला आहे. निक्की हॅले यांची संयुक्त राष्ट्रातील राजदूत म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

०२. सध्या हॅले दक्षिण कॅरिलोना राज्याच्या राज्यपाल आहे. ४४ वर्षांच्या हॅले या ट्रम्प यांच्या प्रशासनाकीय विभागात नेमणूक झालेल्या पहिल्याच महिला आहेत.



०३. सध्या समंथा पावर या संयुक्त राष्ट्रातील अमेरिकेच्या राजदूत आहेत. निक्की हॅले आता पावर यांची जागा घेत संयुक्त राष्ट्रात अमेरिकेचे नेतृत्व करतील. वॉल स्ट्रिट जर्नल हे वृत्त दिले आहे.

०४. आतापर्यंत कोणत्याही भारतीय–अमेरिकन व्यक्तीला अमेरिकेन अध्यक्षांच्या प्रशासकीय विभागात कॅबिनेट दर्जाचे स्थान मिळालेले नाही. प्रशासकीय विभागात कॅबिनेट दर्जाचे स्थान मिळवण्यासाठी सिनेटची परवानगी लागते.

०५. निक्की हॅले यांचे सहकारी मिट रॉम्नी यांची राज्य सचिवपदी नियुक्ती होण्याची शक्यता वर्तवली जाते आहे. याआधी हे पद निक्की हॅले यांना दिले जाणार अशी चर्चा होती.

०६. रॉम्नी यांनी याआधी मॅसेचुएट्स राज्याचे राज्यपद भूषवले आहे. याशिवाय निवृत्त जनरल जेम्स मॅटिस यांची सुरक्षा सचिव म्हणून नेमणूक होण्याचे वृत्त वॉल स्ट्रिट जर्नलकडून देण्यात आले आहे.

०७. निक्की हॅले यांनी नुकतीच न्यूयॉर्कमधील ट्रम्प टॉवरमध्ये डोनाल्ड ट्रम्प यांची भेट घेतली.

## जब्बार पटेल यांना गदिमा पुरस्कार जाहीर

०१. साहित्य, चित्रपट, कलाक्षेत्रात प्रतिष्ठेचा समजला जाणारा गदिमा पुरस्कार यंदा दिग्दर्शक जब्बार पटेल यांना जाहीर झाला आहे.

०२. गदिमांच्या ३९ व्या स्मृतीदिनी, १४ डिसेंबर हा पुरस्कार देण्यात येणार असल्याची माहिती गदिमा प्रतिष्ठानचे विश्वस्त आनंद माडगूळकर यांनी दिली.

०३. गदिमाच्या पत्नी विद्या माडगूळकर यांच्या स्मरणार्थ देण्यात येणारा गृहिणी सखी सचिव पुरस्कार वीणा तांबे यांना, गीतकार नंदेश उमप यांना चैत्रबन पुरस्कार, गायिका आर्या आंबेकरला विद्या प्रज्ञा पुरस्कार उदगीरच्या ऋतुजा कांकरेला विशेष गदिमा पुरस्कारजाहीर करण्यात आला.

## ज्येष्ठ लेखिका डॉ. उषा देशमुख यांना ज्ञानोबा तुकाराम पुरस्कार प्रदान

०१. राज्य शासनांतर्फे ज्येष्ठ संत साहित्य लेखिका डॉ. उषा देशमुख यांना ज्ञानोबा तुकाराम पुरस्कार देऊन त्यांचा गौरव करण्यात आला.

०२. प्राचीन मराठी साहित्याचा अभ्यास आणि साहित्य संशोधन व साहित्य समीक्षा हे त्याच्या अभ्यासाचे क्षेत्र आहे.

०३. मुंबई विद्यापीठातून मराठी विभागप्रमुख म्हणून त्या निवृत्त झालेल्या आहेत.

०४. संतसाहित्यावर आधारित त्यांची 'कुसुमाग्रज साहित्यदर्शन', 'दीपमाळ', 'ज्ञानेश्वरी एक शोध' व 'रामायणाचा आधुनिक साहित्ययावरील प्रभाव' ही खूप गाजलेली पुस्तके आहेत.